बाल कामगार प्रथा (प्रतिबंध व नियमन)
कायदा, १९८६ ची अंमलबजावणी
सन २०१६-१७ - कृती आराखडा.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक सीएलए २०१६/प्र.क्र. २०९/कामगार-४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च, २०१७.

**वाचा :** १) शासन परिपत्रक उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र : बीयुडी २०१६/२०१६-२०१७/ प्र.क्र.५०/प्रशासन-१, दिनांक ०६.०५.२०१६.
२) कामगार आयुक्त यांचे पत्र क्र. काआ/ग्रावि/प्रस्ताव/२०१६-१७/कार्या-१२, दिनांक १०.०३.२०१७.
३) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र : सीएलए २०१५/प्र.क्र.२८९/ कामगार-४, दिनांक ०१.१२.२०१६.
४) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र : सीएलए २०१६/प्र.क्र.२०९/ कामगार-४, दिनांक ०१.१२.२०१६.
५) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र : सीएलए २०१६/प्र.क्र. ३०३/ कामगार-४, दिनांक २५.०३.२०१७.

**प्रस्तावना :**

बालकामगार (प्रतिबंध व नियमन), कायदा १९८६ ची अंमलबजावणी तसेच बालमजुरी विरुध्द व्यापक जनजागृती कार्यक्रमासाठीचा धोरणात्मक निर्णय शासनाने शासन निर्णय दिनांक २०.१.२०११ अन्वये घेतला आहे. तसेच दिनांक ७.१२.२०११ च्या शासन निर्णयाद्वारे बालकामगार राज्य कृती आराखडयामध्ये देखील व्यापक बदल केले आहेत.

बालकामगार प्रथेचे निर्मूलन करण्यासाठी जाहिरातीच्या माध्यमातून जनसामान्यांपर्यंत पोहोचणे आणि जनसहभागातून ही प्रथा नष्ट करणे या उद्देशाने सदर योजनेची जाहिरात प्रसिध्द करण्यासाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता रुपये १,९८,४०,०००/- एवढया रकमेचा नियतव्यय मंजूर केला आहेत. यापैकी आयुक्त, कामगार यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने गत वर्षीचे दूरदर्शनचे रु. १९,७०,८३१/- एवढया रकमेचे देयक अदा करण्याकरिता संदर्भ क्र. ३ येथील शासनाच्या दि. १/१२/२०१६ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. तसेच वृत्तपत्र, एसटी व बस पॅनल आणि एफ.एम रेडिओ चॅनेल वर जाहिराती करण्याच्या प्रयोजनार्थ रु. १,२०,००,०००/- एवढया रकमेस संदर्भ क्र. ४ येथील दिनांक १/१२/२०१६ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र. ५ येथील दिनांक २५/०३/२०१७ च्या शासन निर्णयान्वये यावर्षी दूरदर्शन वर जाहिरात देण्याकरीता रु. ८,६४,२२५/- एवढया रकमेस मंजूरी देण्यात आली आहे.

वित्त विभागाच्या दि. ०८/०२/२०१७ च्या परिपत्रकान्वये योजनेंतर्गत खर्चाची मर्यादा ८०% एवढी विहित करण्यात आल्यामुळे, या प्रयोजनार्थ मंजूर करण्यात आलेल्या एकूण रु. १,९८,४०,०००/- एवढया अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी ८०% म्हणजे रु. १,५८,७२,०००/- एवढी रक्कम उपलब्ध होती. यामुळे, वर उल्लेखित एकुण खर्चाची रक्कम रु. १,४८,३५,०५६/- वजा जाता संगणक प्रणालीवर प्रत्यक्षात रक्कम रु.१०,३६,९४४/- उपलब्ध आहे.

कामगार आयुक्त यांचेकडून प्राप्त प्रस्तावानुसार सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात बालकामगार कृती आराखडयाच्या अंमलबजावणीच्या दृष्टीने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे:

**<u>शासन निर्णय</u> :**

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता रुपये १,९८,४०,०००/- एवढया रकमेचा नियतव्यय मंजूर केला होता. यापैकी, प्रत्यक्षात उपलब्ध ८०% म्हणजे रु. १,५८,७२,०००/- एवढया रकमेपैकी वर उल्लेखित एकुण खर्चाची रक्कम रु. १,४८,३५,०५६/- वजा जाता संगणक प्रणालीवर प्रत्यक्षात रक्कम रु.१०,३६,९४४/- उपलब्ध आहे.

एस.टी. बस आगारामध्ये मे.व्रित्ती सोल्यूशन्स लि., पुणे द्वारे एस.टी. बस आगारामध्ये ऑडियोद्वारे जाहिरात करण्यासाठी रु.१०,३६,९४४/- प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर रक्कम ही क्र. के-४, मुख्यलेखाशिर्ष-२२३०-कामगार व सेवायोजन, ०१-कामगार, १११ कामगारांसाठी सामाजिक सुरक्षितता, राज्य योजनांतर्गत योजना (००) (१४) बालकामगार प्रतिबंध अधिनियम १९८६ (२२३०५८२८) या उपशीर्षाखाली अर्थसंकल्पित केलेल्या निधीतून खर्च करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी प्रस्तावातील कामांवर प्रचलित पध्दतीप्रमाणे खर्च करावा. तसेच यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. यासाठी नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून कामगार आयुक्त कार्यालयाचे संबंधित नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी काम पहातील.

सदर शासन निर्णय हा शासन परिपत्रक उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक : बीयुडी-२०१६/२०१६-१७/(प्र.क्र.५०)/ प्रशासन-१, दि.०६.०५.२०१६ व शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक : अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.८.२.२०१७, ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२७१९०२२१९६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Meghashyam B Nawar

Digitally signed by Meghashyam B Nawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IEL Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7d2d0d7e2120f3814eff2bd1a5d3c902860ebecbe995c3b2260a01b762f45c3a, serialNumber=a5505efe2f8776471817f30ce3446f37d84d8aeddd35d8e3a76a12d1b08434dd, cn=Meghashyam B Nawar
Date: 2017.03.27 19:04:24 +05'30'

**(मेघःश्याम नवार)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) कामगार आयुक्त, कामगार आयुक्त कार्यालय, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई ५१.
२) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय

५) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक
६) सह सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक
७) कक्ष अधिकारी (प्रशासन-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कक्ष अधिकारी (प्रशासन-२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवड नस्ती, कामगार-४